श्री.भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे येथे जमीनीखालील पाण्याच्या टाकीचे बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय क्रमांक : बीसीडी-२०२१/प्र.क्र.४०५/प्रशा-१

गो.ते.रुग्णालय आवार,नवीन मंत्रालय, ९ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : १० फेब्रुवारी, २०२२

वाचा : संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक: वैशिवसं/ श्रीभाहीशावैमधुळे /पाण्याची टाकी/आय-प/१५२८३/२१, दिनांक २०.१२.२०२१

शासन निर्णय :

विभागाच्या नियंत्रणाखालील श्री.भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे येथे जमीनीखालील पाण्याच्या टाकी आवश्यक असल्याने सदर बांधकाम करण्यासाठी रुपये १,७०,१७,७५९/- (रुपये एक कोटी, सत्तर लक्ष, सतरा हजार, सातशे एकोणसाठ फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम |
|---|---|---|
| १. | Construction of U.G.Water Tank at Shri Bhausaheb Hire Govt.Medical College Dhule | १,७०,१७,७५९ |

अटी :

१. सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३ /प्र.क्र.१७७ / तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदर बांधकामासठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३ / प्र.क्र.३० / २०१३ / विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०९१७३७४६१४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
Date: 2022.02.10 12:18:38 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

( सुधीर शेट्टी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक

५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे
६) अधिष्ठाता, श्री.भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, धुळे
७) जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे
८) निवडनस्ती (प्रशा-१).